जिल्हा क्रीडा अधिकारी/सहायक संचालक,
गट-अ या पदावर पदोन्नतीने पदस्थापना
देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संक्रीआ-१०२०/प्र.क्र.७८/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख :- २९ मार्च, २०२२

**शासन निर्णय :-**

क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवरील तालुका क्रीडा अधिकारी, गट-ब (राजपत्रित) (वेतनस्तर एस-१५, रु.४१८००-१३२३००) या पदावर कार्यरत असणाऱ्या खालील नमूद अधिकाऱ्यांना, शासनाने मान्य केलेल्या सन २०२०-२१ च्या निवडसूचीनुसार जिल्हा क्रीडा अधिकारी/सहायक संचालक, गट-अ (वेतनस्तर एस-२०, रु. ५६१००-१७७५००) या पदावर जेष्ठतेनुसार व गुणवत्तेनुसार खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. राजेश बागूल, तालुका क्रीडा अधिकारी,खेड, जि.पुणे | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी, नाशिक |
| २ | श्रीमती लता ठोसरे , तालुका क्रीडा अधिकारी,किनवट, जि. नांदेड | इ.मा.व. | जिल्हा क्रीडा अधिकारी,वाशिम |
| ३ | श्री.सुहास व्हनमाने, तालुका क्रीडा अधिकारी,कराड, जि. सातारा | भ.ज.(क) | जिल्हा क्रीडा अधिकारी,पालघर |
| ४ | श्रीमती आशा मेश्राम, तालुका क्रीडा अधिकारी,हिंगणा, जि. नागपूर | अनु.जाती | जिल्हा क्रीडा अधिकारी,भंडारा |
| ५ | श्रीमती पल्लवी धात्रक, तालुका क्रीडा अधिकारी,इगतपुरी, जि.नाशिक | भ.ज.(ड) | जिल्हा क्रीडा अधिकारी, नागपूर |
| ६ | श्रीमती विद्या शिरस, तालुका क्रीडा अधिकारी,पुणे (मुख्यालय ) | इ.मा.व. | जिल्हा क्रीडा अधिकारी,सिंधुदुर्ग |
| ७ | श्री. जगन्नाथ लकडे, तालुका क्रीडा अधिकारी,बारामती, जि.पुणे | भ.ज.(क) | जिल्हा क्रीडा अधिकारी, लातूर |

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | श्री. उदय पवार, तालुका क्रीडा अधिकारी,पुणे (मुख्यालय) | खुला | सहायक संचालक (मुख्यालय), पुणे |
| ९ | श्री. अभय चव्हाण, तालुका क्रीडा अधिकारी,मुंबई शहर | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी,मुंबई शहर |
| १० | श्रीम.सुहासिनी देशमुख, तालुका क्रीडा अधिकारी,अंबड,जि.जालना | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी,बीड |
| ११ | श्री. प्रशांत दोंदल, तालुका क्रीडा अधिकारी,आर्वी, जि. वर्धा | इ.मा.व. | जिल्हा क्रीडा अधिकारी, गडचिरोली |
| १२ | श्रीमती मिरा रायबान, तालुका क्रीडा अधिकारी,निलंगा, जि. लातूर | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी, उस्मानाबाद |
| १३ | श्रीमती वर्षा शिदे, तालुका क्रीडा अधिकारी,अंधेरी,जि.मुंबई उपनगर | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी, अमरावती |
| १४ | श्री.गणेश कुलकर्णी, तालुका क्रीडा अधिकारी,कारंजा, जि.वाशिम | खुला | जिल्हा क्रीडा अधिकारी, अकोला |

२. सदर पदोन्नतीनुसार संबंधित अधिकाऱ्यांना देण्यात आलेली पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना दि.१४ जुलै, २०२१ मधील विभागीय संवर्ग वाटपाच्या तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

३. सदर पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच सदर शासन निर्णयाच्या दिनांकास मा.न्यायालयात प्रलंबित असलेल्या पदोन्नती विषयक प्रकरणांवरील निर्णयाच्या निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

४. आयुक्त,क्रीडा व युवक सेवा,पुणे यांनी संबंधित अधिकाऱ्यांस पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करावी. तसेच संबंधित अधिकारी यांनी पदोन्नती आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे व संबंधित अधिकारी रुजू झाल्याचा दिनांक आयुक्त,क्रीडा व युवक सेवा यांनी शासनास कळवावा. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदांचे अतिरीक्त कार्यभार सोपविण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमीत करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२९१६३०५५०९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2022.03.29 16:34:55 +05'30'

**( स्वाती नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत).
३. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
४. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
५. संबंधित अधिकारी(संचालनालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी:-**

१.मा.मंत्री,क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी
२. मा. राज्यमंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांचे विशेष कार्य अधिकारी
३. सचिव (सा.वि.स),सामान्य प्रशासन विभाग(कार्यासन १६ ब)
४. संबंधित कार्यासन अधिकारी (क्रीयुसे-१/३)
५. निवड नस्ती (क्रीयुसे-२).